दहशतवाद विरोधी पथक पोलीस ठाणे, गु.नों.क्र. ३२/२०११ मधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणामध्ये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या ॲड. श्री. राजा ठाकरे यांना व्यावसायिक फी मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एसपीपी-२०१४/प्र.क्र.११७/पोल-१०**

जागतिक व्यापार केंद्र, सेंटर-१, ३० वा मजला,

कफ परेड, मुंबई-४०० ००५

दिनांक : २६ ऑगस्ट, २०१४

**<u>संदर्भ :-</u>**

शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग क्र. एसपीपी-१०१४/ए.एस.३०/डी-चौदा, दिनांक ४.६.२०१४

**शासन निर्णय :-**

दहशतवाद विरोधी पथक पोलीस ठाणे, गु.नों.क्र.३२/२०११ ( पुणे जंगली महाराज रोड बॉम्बस्फोट, डेक्कन पोलीस ठाणे गु.नों.क्र.१६८/२०१२) या गुन्ह्यामधून उद्भवणा-या न्यायालयीन प्रकरणांमध्ये शासनाच्या वतीने कामकाज पहाण्यासाठी ॲड. श्री. राजा ठाकरे यांची विधी व न्याय विभागाच्या वरील संदर्भाधीन अधिसूचनेन्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. सबब, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. राजा ठाकरे यांना प्रतिदिन खालीलप्रमाणे फी अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी-रु . २०,०००/-

ब) विचार विनिमय फी (प्रतितास) -रु. ७,०००/-
( कमाल मर्यादा प्रतिदिन रु. २५,०००/-)

क) प्रवास खर्च - वातानुकुलीत बस सहित इतर सर्व प्रकारच्या सार्वजनिक बसचे प्रत्यक्ष भाडे अनुज्ञेय राहील ( मुंबई ते पुणे )

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिका-याकडून प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान

होणार नाही, याची दक्षता घ्यावी. तसेच, प्रस्तुत प्रकरणी ॲड. श्री. राजा ठाकरे यांना अपरिणामकारक सुनावणी फी किंवा अन्य कोणत्याही प्रकारची फी अनुज्ञेय असणार नाही

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०१, गुन्हा अन्वेषण व दक्षता (००) (०५) दहशतवाद विरोधी पथक - (२०५५ ०५७१) - २८ व्यावसायिक सेवा या लेखाशीर्षाखालील त्या त्या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२३/२०१४/व्यय-७, दिनांक ०२.०८.२०१४ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६११३१०५७१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Veersinh Muralidhar Patil

Digitally signed by Veersinh Muralidhar Patil
DN: CN = Veersinh Muralidhar Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Home
Date: 2014.08.26 12:35:59 +05'30'

**(वी.मु.पाटील)**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, नागपाडा, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा) महाराष्ट्र १ , मुंबई
३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. ॲड.श्री.राजा ठाकरे, भासवान, ए-११-४३, राजावाडी, घाटकोपर, मुंबई-४०० ०७७.
६. विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (व्यय- ७), मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (पोल-१०).